**तेराव्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार विविध घटकांसाठी केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या अनुदानाचा विहित प्रयोजनाकरिता विनियोग करण्यासाठी उच्चस्तरीय संनियंत्रण समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक तेविआ १०१०/प्र.क्र.६२/२०१०/वित्त आयोग**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक - २० ऑक्टोबर २०१०.**

**प्रस्तावना :-**

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २८० नुसार दर ५ वर्षांनी केंद्रीय वित्त आयोगाची स्थापना करणे आवश्यक आहे. त्यानुसार दिनांक १३ नोव्हेंबर २००७ च्या अधिसूचनेनुसार डॉ. विजय केळकर, माजी वित्त सचिव आणि तत्कालिन वित्त मंत्र्यांचे सल्लागार यांचे अध्यक्षतेखाली तेराव्या केंद्रीय वित्त आयोगाची स्थापना करण्यात आली. या आयोगाच्या शिफारशींचा कालावधी २०१०-२०१५ असा राहणार आहे. सदर आयोगाने आपला अहवाल दिनांक ३० डिसेंबर २००९ रोजी केंद्र शासनास सादर केला असून, केंद्र शासनाने तो स्वीकृत करुन, कार्यपालन अहवालासह भारतीय संसदेस सादर केलेला आहे या आयोगाच्या शिफारशीनुसार देशभरातील सर्व घटक राज्यांना केंद्रीय करातील विभागणीयोग्य निव्वळ उत्पन्नापैकी ३२% निधीचे वितरण करण्यात येणार आहे. त्याचप्रमाणे राज्याराज्यांमध्ये करावयाच्या समांतर वितरणापैकी महाराष्ट्र राज्यास ५.१९९% निधी प्राप्त होणार आहे. सदर अनुदानाचा विनियोग करण्यासाठी आयोगाने विशिष्ट अटी व शर्ती विहित केल्या असून या रकमेचा विनियोग होण्यासाठी उच्चस्तरीय संनियंत्रण समिती स्थापन करावी असेही आयोगाने शिफारसीत केले आहे. त्यानुसार सदर संनियंत्रण समिती नेमावयाचा प्रस्ताव राज्य शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

तेराव्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार विविध घटकांखाली केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या अनुदानाचा, विहित अटी व शर्ती लक्षांत घेऊन विशिष्ट प्रयोजनासाठी विनियोग करण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे उच्चस्तरीय संनियंत्रण समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देत आहे :-

**१३ वा वित्त आयोग - उच्चस्तरीय संनियंत्रण समिती**

| | | |
|---|---|---|
| मा. मुख्य सचिव | ... | अध्यक्ष |
| अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (वित्त) | ... | सदस्य |
| संबंधित विभागाचे अ.मु.स./प्र.स./सचिव | ... | सदस्य |

२.	सदर समितीची बैठक दर तीन महिन्यांनी होईल. बैठकीचे इतिवृत्त तयार करणेची जबाबदारी संबंधित विभागाची राहील. वर्षाच्या सुरुवातीलाच ही समिति केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार प्राप्त होणा-या निधी अंतर्गत येणाऱ्या प्रत्येक क्षेत्रातील प्रकल्पांचे प्रस्ताव तपासून त्यास मान्यता देईल. ही समिती नियोजित योजना/प्रकल्पाबाबत भौतिक व आर्थिक उद्दीष्ट विहित करुन त्याच्या पूर्ततेवर नियंत्रण ठेवेल.

३.	सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा **सांकेतांक क्रमांक २०१०१०२०२०१०१३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

(अ. ना. भोसले)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
१. राज्यपालांचे सचिव,
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
४. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई,
५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागरी,
८. बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई,
९. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सीडीओ बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१,
१०.भारतीय कम्यसिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भुवन, एस.व्ही.पटेल,रोड, मुंबई-४०० ००४,
११.भारतीय कम्युसिस्ट पार्टी (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोव मिल पॅलेस, वरळी, मुंबई-४०० ०१३,
१२.इंडियन नॅशनल कॉंग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५,
१३.नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१,
१४.शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८,
१५.मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
१६.प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय (ग्रंथालय), विधानभवन, मुंबई.
१७.(अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८.अपर मुख्य सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१९.अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०.प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१.प्रधान सचिव (बंदरे), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

२२.प्रधान सचिव (अ.व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२३.प्रधान सचिव (उर्जा), उद्योग, उर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
२४.प्रधान सचिव (प.व सां.का.), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२५.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२६.प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ३२.
२७.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२८.प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सा. प्र. विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२९.सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३०.सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३१.सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३२.सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३३.सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३४.सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३५.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
३६.वित्त विभाग, मंत्रालयातील सर्व सहसचिव, उप सचिव व अवर सचिव.
३७.निवडनस्ती, वित्त आयोग कक्ष, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.